महाराष्ट्र पोलीस अधिनियम,कलम २२ स (१) (२) नुसार नव्याने स्थापन केलेल्या नाशिक,नागपूर,औरंगाबाद,पुणे अमरावती आणि नवी मुंबई (कोकण विभाग) येथील विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयाकरिता विभाग प्रमुख आणि कार्यालयीन प्रमुख तथा आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र.-विपोतप्रा-०६१७/प्र.क्रं.१५८/पोल-१४**

दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२

**दिनांक : ०४/०७/२०१७**

वाचा : १) महाराष्ट्र पोलीस अधिनियम-२०१४, दि.२५/०६/२०१४,
२) शासन अधिसुचना क्र.एमआयएस-३६१४/प्र.क्र.०४/भाग-२/पोल-१४, दि.१३/०४/२०१७
३) शासन अधिसुचना क्र.एमआयएस-३६१४/प्र.क्र.०४/भाग-२/पोल-१४, दि.१५/०४/२०१७
४) वित्त विभाग , शासन निर्णय, क्रं.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) मधील कलम २२ स मध्ये विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण गठीत करण्याची तरतूद करण्यात आली असुन कलम २२ स (२) मध्ये प्राधिकरणाची रचना नमुद करण्यात आली आहे. शासन अधिसूचना, गृह विभाग दि.१३/०४/२०१७ आणि दि.१५/०४/२०१७ नुसार,नाशिक,नागपूर,औरंगाबाद,पुणे,अमरावती आणि नवी मुंबई (कोकण विभाग ) येथे विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरणे गठीत करण्यात आली आहे.

नव्याने स्थापन झालेल्या नाशिक,नागपूर,औरंगाबाद,पुणे,अमरावती आणि नवी मुंबई ( कोकण विभाग ) येथील विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयाच्या व्यवस्थापनाकरिता आवर्ती व अनावर्ती आकस्मिक खर्चाचे अनुषंगाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक, अ.क्र.१, नियम क्र.२ व अ.क्र.१, नियम क्र.२ व ३ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय मर्यादेनुसार कार्यवाही करण्यासाठी उपरोक्त विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयाकरिता विभाग प्रमुख आणिं कार्यालयीन प्रमुख तथा आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नव्याने स्थापन झालेल्या ( नाशिक,औरंगाबाद,नागपूर, पुणे, अमरावती, नवी मुंबई (कोकण विभाग) सहा विभागस्तरीय पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयांसाठी आकस्मिक खर्चाचे अनुषंगाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग एक,मुंबई वित्तीय नियम,१९५९ अंतर्गत अ.क्र.१, नियम क्र.२ व अ.क्र.३, नियम क्र.२ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय मर्यादेनुसार कार्यवाही करण्यासाठी खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार विभाग प्रमुख आणि कार्यालयीन प्रमूख तथा आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | **विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरणाचे नाव** | **विभाग प्रमुख** | **कार्यालयीन प्रमुख तथा आहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | पोलीस आयुक्त,नाशिक | पोलीस उप आयुक्त, (मुख्यालय)नाशिक |
| २ | औरंगाबाद | पोलीस आयुक्त,औरंगाबाद | पोलीस उप आयुक्त, (मुख्यालय)औरंगाबाद |
| ३ | नागपूर | पोलीस आयुक्त,नागपूर | पोलीस उप आयुक्त, (मुख्यालय)नागपूर |
| ४ | पुणे | पोलीस आयुक्त,पुणे | पोलीस उप आयुक्त, (मुख्यालय)पुणे |
| ५ | अमरावती | पोलीस आयुक्त,अमरावती | पोलीस उप आयुक्त, (मुख्यालय)अमरावती |
| ६ | नवी मुंबई (कोकण) | पोलीस आयुक्त,नवी मुंबई (कोकण) | पोलीस उप आयुक्त, (मुख्यालय) नवी मुंबई(कोकण) |

हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका"१९७८, भाग पहिला, उपविभाग एक,अ.क्र-१, नियम क्र.२ अ.क्र.२ व अ.क्र.३,नियम क्र.२, अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०४१५२२२३९८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday B Kannav

Digitally signed by Uday B Kannav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Environment Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fe29f04f38aba57aa3616e5e7991a08603470b8079251f1060757c167088627b, serialNumber=46ef62b925419a1f0a32de30af8bc7f390afefe8ff662f0e5937180b27711615, cn=Uday B Kannav
Date: 2017.07.04 15:22:34 +05'30'

**(उ.बा. काण्णव)**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक,
२) प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक,
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४) पोलीस आयुक्त, ( नाशिक,औरंगाबाद,नागपूर, पुणे, अमरावती, नवी मुंबई (कोकण विभाग)
५) पोलीस उप आयुक्त(मुख्यालय), ( नाशिक,औरंगाबाद,नागपूर, पुणे, अमरावती, नवी मुंबई (कोकण विभाग)
६) सदस्य सचिव,राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण,एम.टी.एन.एल.कुपरेज एक्सप्रेज इमारत, चौथा मजला,महर्षी कर्वे मार्ग, मुंबई.
७) अध्यक्ष/ सदस्य,विभागस्तरीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक,औरंगाबाद,नागपूर, पुणे,अमरावती, नवी मुंबई (कोकण
८) सदस्य सचिव, विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, ( नाशिक,औरंगाबाद,नागपूर, पुणे, अमरावती, नवी मुंबई (कोकण विभाग)

९) अपर पोलीस महासंचालक (आस्थापना) तथा सदस्य सचिव, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण, पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई
१०) महालेखापाल- १/२(लेखा व अधिदान)/( लेखा व परिक्षा), मुंबई/नागपूर.
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१२) गृह विभाग/बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती/पोल-१४